सद्गदित झाला. दुःखानें त्याला मूर्च्छा आली. तेव्हां सर्व ब्राह्मणांनीं भ्रात्यांसह त्याला आश्वासन दिलें.

( २ ) नंतर धौम्य त्या नृपतीला असें अर्थपूर्ण वचन बोलला—हे राजन्, तूं विद्वान् असून सत्यनिष्ठ, जितेंद्रिय व दान्त आहेस, तुझ्यासारखे श्रेष्ठ पुरुष आपत्कालीं केव्हांहि असे मोहित होत नाहींत. देवांवरहि अशीं संकटें अनेक वेळां आलेलीं आहेत व त्या महात्म्यांनीं त्या त्या वेळीं शत्रूच्या निग्रहासाठीं कपटवेष धारण केले आहेत.

इंद्र निषधदेशीं जाऊन पर्वतशिखरावरील आश्रमांत कपटवेषानें राहिला व त्यानें गुप्त वेषानें शत्रुनिग्रहाचें कार्य केलें. विष्णूनें दैत्यांच्या नाशासाठीं अश्वशिराचें रूप धारण करून अदितीच्या गर्भामध्यें अज्ञातवासांत दीर्घकाल काढला. त्याचप्रमाणें त्यानें ब्राह्मण बटूचें वामनरूप धारण केलें व त्या कपट वेषानें तीन पावलांत बलीचें राज्य हरण केलें, तें तुला ठाऊकच आहे.

त्याचप्रमाणें अग्नीनें गुप्त वेषानें जलांत निवास करून देवांचें काय केलें, तेंहि तुला श्रुत आहे. हे धर्मज्ञा, हरीनें शत्रुनिग्रहासाठीं इंद्राच्या वज्रांत गुप्तपणें प्रवेश करून जें कर्म केलें तेंहि तूं ऐकलेंच आहेस. और्व महर्षीनें देवकार्यासाठीं मातेच्या मांडीमध्यें गुप्तपणें वास केला होता. तोहि वृत्तान्त तुला माहित आहे. सर्व भूलोकाला प्रकाशित करणाऱ्या तेजस्वी आदित्यानें गुप्तवेषानेंच पृथ्वीवरील सर्व शत्रूंना दग्ध केलें. भयंकर पराक्रमी विष्णूनें दशरथाच्या गृहीं छन्नरूपानें राहूनच युद्धांत रावणाचा वध केला. याप्रमाणें अनेक महात्म्यांनीं त्या त्या वेळीं कपटवेष धारण करून शत्रूंचा पराभव केला आहे. त्याप्रमाणें तूंहि शत्रूंना युद्धांत जिंकशील.

(३) अशा प्रकारें अनेक दृष्टान्त देऊन धौम्यानें युधिष्ठिराचें सान्त्वन केलें, परंतु त्या धर्मनिष्ठ कुंतीपुत्रानें कपटानें शत्रुवध करणें मान्य केलें नाहीं. तेव्हां महाबलाढ्य भीमसेन अतिशय हर्षानें राजाला म्हणाला—" हे महाराज, आजपर्यंत गांडीवधारी धनंजयानें तुझ्याकडे व धर्माकडे लक्ष देऊन कोणतेंहि साहस केलें नाहीं. भीमपराक्रमी व सामर्थ्यसंपन्न नकुल-सहदेव शत्रूंचा विध्वंस करण्यास उद्युक्त झाले असतां मी त्या उभयतांचें वारंवार निवारण करीत आलों. जोंवर तूं आम्हांला अनुज्ञा दिली नाहींस, तोंवर आम्ही शत्रूंवर चालून जाणार नाहीं. जेव्हां तूं आज्ञा करशील, तेव्हांच आम्ही सर्व शत्रूंचा तत्काल नाश करूं."

**वैशंपायन**—राजा, भीमसेनाचें हें भाषण ऐकून ब्राह्मणांनीं त्या भारतांना शुभ आशीर्वाद दिले, त्यांचा निरोप घेतला व ते ब्राह्मण आपापल्या गृहीं निघून गेले. सर्व वेदवेत्ते यति व विद्वान् मुनि धौम्यासह पांडवांच्या पुनर्दर्शनाच्या इच्छेनें तेथेंच राहिले. नंतर ते धनुष्यधारी पांच पांडव धौम्य व कृष्णा यांच्यासह तेथून निघाले व त्या प्रदेशांतून कोसभर दूर गेले. त्या नरश्रेष्ठांनीं दुसऱ्या दिवसापासून अज्ञातवासाच्या जीवनाचा आरंभ केला. ते पांची भ्राते पृथक् पृथक् शास्त्रें जाणणारे व सर्व मंत्रविशारद होते. संधि व विग्रह यांचा कालहि ते उत्तम प्रकारें जाणत होते. ते दीर्घदर्शी बुद्धिमान् पांडव पुढील कार्याचा विचार करण्यासाठीं एकत्र बसले. ३. २२. ३१५.

येथें बाविसावें आरणेयपर्व समाप्त झालें.

---

या पर्वाची फलश्रुति—सौति ऋषींना म्हणाला—हें आरण्यकपर्व ऐकणारा मनुष्य महापापापासून मुक्त होतो. धनरहित पुरुषाला धनप्राप्ति होऊन तो पुत्र-पौत्रांनीं युक्त होतो. कोणीहि स्त्री किंवा पुरुष शुचिर्भूत होऊन शुद्ध चित्तानें जी जी कामना करतील, ती ती त्यांची इच्छा पूर्ण होईल, यांत संशय नाहीं. हें आरण्यकपर्व श्रवण केलें असतां किंवा त्याचें अध्ययन केलें असतां ब्राह्मणांना पायसान्नाचें भोजन द्यावें आणि वस्त्र, गायी, सुवर्ण व रत्नें यांच्या दानांनीं त्यांचा सत्कार करावा.

ब्राह्मण संतुष्ट झाले असतां पांडुपुत्र, ब्रह्मा, विष्णु, रुद्र, इत्यादि सर्व देवगण, त्याचप्रमाणें भूतें, मुनि, देवी आणि पितृगण हे सर्व संतुष्ट होतात. अन्न, वस्त्र, सुवर्णभूषणें यांनीं वाचकाचा यथाशक्ति सत्कार करावा. पठन करणाराला कांशाच्या चरवीसह अलंकारांनीं भूषित केलेली कपिला गाय द्यावी. पांडवांच्या संतोषासाठीं ब्राह्मण-भोजन घालावें. जो पुरुषश्रेष्ठ हें आरण्यक आख्यान श्रवण करितो, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन त्याला शेवटीं स्वर्गगति प्राप्त होते.

येथें तिसरें वनपर्व समाप्त झालें.

---

याच्या पुढें चवथ्या विराटपर्वाचा आरंभ होईल त्याचा हा पहिला श्लोक आहे—

जनमेजय उवाच—

कथं विराटनगरे मम पूर्वपितामहाः ।
अज्ञातवासमुषिता दुर्योधनभयार्दिताः ॥

